राज्यातील आदिवासी विकास विभागातंर्गत शासकीय व अनुदानित आश्रमशाळा, शासकीय वसतिगृह व एकलव्य निवासी शाळा सुरक्षितपणे सुरु करण्यासाठी मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३**
**मादम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २० नोव्हेंबर, २०२०**

**वाचा :-** १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा २०१५/प्र.क्र.३४१ (भाग-१) / का.१३, दि.१५ जून, २०१७.
२) शासन परिपत्रक , आदिवासी विकास विभाग, क्र. शाआशा २०२०/प्र.क्र.५८/का.१३-अ, दि.१२ जून, २०२० व दि.१५ जून, २०२०.
३) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि.१५ जून, २०२०.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. अआशा २०२०/प्र.क्र.७९/का.११, दि.९ ऑक्टोंबर, २०२०.
५) शासन परिपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि.२९ ऑक्टोंबर, २०२०.
६) शासन परिपत्रक, शालेश शिक्षण व क्रीडा विभाग, क्र.संकीर्ण २०२०/प्र.क्र.८६/एसडी-६, दि.१० नोव्हेंबर, २०२०.

**पार्श्वभूमी :-**

आदिवासी विकास विभागातील शासकीय व अनुदानित आश्रमशाळा कोरोना (COVID-१९) विषाणूच्या प्रादुर्भावामुळे बंद करण्यात आलेल्या होत्या. अपर आयुक्त, नाशिक व ठाणे विभागातील आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक १५ जून आणि अपर आयुक्त, अमरावती व नागपूर विभागातील आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना दिनांक २६ जून पासून शाळेत उपस्थित राहणेस कळविण्यात आलेले आहे. तसेच शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या संदर्भ क्र. ०३ येथील शासन परिपत्रकानुसार राज्यात कोव्हीड- १९ च्या प्रादूर्भावामुळे उद्भवलेल्या परिस्थितीत राज्यातील शाळा प्रत्यक्षात सुरु करणे शक्य नसल्याने दि.१५ जुन, २०२० पासून शैक्षणिक वर्ष सुरु करुन स्थानिक परिस्थितीनुसार प्रत्यक्ष शाळा टप्प्या-टप्प्याने सुरु करण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी, महानगरपालिका आयुक्त यांच्या सहाय्याने संबंधित शाळा व्यवस्थापन समिती यांना प्रदान करण्यात आले आहेत.

आदिवासी विकास विभागातंर्गत चालविण्यात येणाऱ्या शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य निवासी शाळांतील विद्यार्थ्यांचे पहिल्या सत्रात पर्यायी व्यवस्थेद्वारे शिक्षण सुरू ठेवण्याच्या अनुषंगाने विद्यार्थ्यांना शाळेपर्यंत आणण्याऐवजी शिक्षण विद्यार्थ्यांपर्यत पोहचविण्यासाठी संदर्भ क्र.४ वरील शासन निर्णयान्वये अनलॉक लर्निंग या प्रकल्पास मान्यता देण्यात आली आहे.

राज्यात Mission Begin Again अंतर्गत राज्यातील सर्व आस्थापना टप्प्या - टप्प्याने सुरु करण्यासाठी मार्गदर्शक सूचना (SOP) निर्गमित करण्यात येत आहेत. त्याच धर्तीवर शैक्षणिक वर्ष दि.१५ जून, २०२० पासून सुरू झाले असले. तरी, शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य निवासी शाळांतील विद्यार्थ्यांचे प्रत्यक्ष प्रथम: इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी साठी शाळा सुरु करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**परिपत्रक:-**

राज्यातील आदिवासी विकास विभागातंर्गत शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा व एकलव्य निवासी शाळेतील इयत्ता ९ वी ते इयत्ता १२ वी चे वर्ग दिनांक ०१ डिसेंबर, २०२० पासून सुरू करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच इयत्ता ९ वी ते १२ वीच्या विद्यार्थ्यांकरिता या विभागातंर्गत असलेले शासकीय वसतिगृहे सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, एकलव्य निवासी शाळा व शासकीय वसतिगृहे सुरु करण्यापूर्वी व सुरु झाल्यानंतर आरोग्य, स्वच्छत्ता व इतर सुरक्षाविषयक उपाययोजनांबाबतच्या मार्गदर्शक सूचना सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ व परिशिष्ट-ब मध्ये देण्यात आल्या आहेत.

२. कोविड-१९ बाबत केंद्र व राज्य शासनाच्या सूचनांचे पालन करण्यात यावे. विद्यार्थ्यांच्या उपस्थितीबाबत पालकांकडून आवश्यक ती लेखी संमती घेण्यात यावी.

३. शालेय शिक्षण व क्रिडा विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १५ जुन, २०२०, दिनांक २९ ऑक्टोबर,२०२० व दि.१० नोव्हेंबर, २०२० रोजीच्या परिपत्रकातील सुचनांचे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२०११२०११३५२१०३२४ असा आहे. सदर परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=9adf2fe1f77176611c6dae66e0049cd0f51f36579d7c577ba3ed2c944d27d926, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=dee8a196fb0bb879933a88f87075cc443d363994879d49e0c1ba541465369700, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2020.11.20 11:37:07 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
४) मा. अध्यक्ष व मा. उपाध्यक्ष, विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
५) मा. सभापती व मा. उपसभापती, विधान सभा, विधान भवन, मुंबई.
६) मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
७) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव.
८) सचिव, आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१०) सर्व सह सचिव/उप सचिव, अवर सचिव व कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती व नागपूर.

१२) सर्व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.

१३) सर्व एकलव्य निवासी शाळा प्राचार्य (प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)

१४) सर्व शासकीय व अनुदानित आश्रमशाळा तसेच नामांकित शाळांचे मुख्याध्यापक, शासकीय वसतीगृहांचे गृहपाल (प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत)

१५) निवड नस्ती (का-१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

शासन परिपत्रक, क्रमांक शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३ ; दि.२० नोव्हेंबर,२०२० सोबतचे

## परिशिष्ट-अ

## शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, एकलव्य निवासी शाळा व शासकीय वसतिगृहे सुरु करण्यापूर्वी आरोग्य, स्वच्छत्ता व इतर सुरक्षाविषयक उपाययोजनांबाबतच्या मार्गदर्शक सूचना

### १) शाळेत/वसतिगृहात स्वच्छता व निर्जंतुकीकरण विषयक सुविधा सुनिश्चित करणे:-

- शाळेत/वसतिगृहात हात धुण्यासाठी सुविधा उपलब्ध करुन देणे.
- Thermometer, Thermal Scanner/Gun, Pulse Oxymeter, जंतूनाशक, साबण, पाणी इत्यादी आवश्यक वस्तुंची उपलब्धता तसेच शाळेची/वसतिगृहाची स्वच्छता व निर्जंतुकीकरण सुनिश्चित करावी. या विभागाच्या दि.१५/६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार गृहपाल/मुख्याध्यापक यांचे अध्यक्षतेखालील खरेदी समितीने, सदरची खरेदी उद्योग व उर्जा विभागाच्या दि.०१.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये विहीत पध्दतीने करुन त्यावरील खर्च शाळा व्यवस्थापन समितीच्या निधीतून भागविण्यात यावा. वसतिगृहाच्या खर्चासाठी प्रकल्प अधिकारी यांनी निधी उपलब्ध करावा. वापरण्यात येणारे thermometer हे calibrated contactless infrared digital thermometer असावे.
- शाळेत/वसतिगृहात वाहतुक सुविधांचे निर्जंतुकीकरण सुनिश्चित करावे.
- एखाद्या शाळेत/वसतिगृहात क्वारंटाईन सेंटर असल्यास स्थानिक प्रशासनाने ते इतर ठिकाणी स्थानापन्न करावे. स्थानिक प्रशासनाने अशा शाळेचे शाळेत/वसतिगृहाचे हस्तांतरण शाळा/वसतिगृह व्यवस्थापनाकडे करण्यापूर्वी त्याचे पूर्णत: निर्जंतुकीकरण करावे.
- क्वारंटाईन सेंटर इतर ठिकाणी नेणे शक्य नसल्यास शाळा खुल्या परिसरात किंवा इतर ठिकाणी भरवावी.

### २) शिक्षकांची कोविड-१९ बाबतची चाचणी:-

- शाळेतील सर्व शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांनी तसेच शासकीय वसतिगृहातील सर्व कर्मचाऱ्यांनी दि. २३ ते २९ नोव्हेंबर, २०२० या दरम्यान कोविड-१९ साठीची RTPCR चाचणी करणे बंधनकारक असेल. शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांनी तसेच वसतिगृह कर्मचाऱ्यांनी सदर चाचणीचे प्रयोगशाळेने दिलेले प्रमाणपत्र मुख्याध्यापकास/वसतिगृह गृहपालास सादर करावे. सदर प्रमाणपत्राची शाळा मुख्याध्यापकांनी/वसतिगृह गृहपालांनी पडताळणी करावी.
- ज्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे तसेच वसतिगृह कर्मचाऱ्यांचे चाचणी अहवाल positive असतील त्यांनी डॉक्टरांनी प्रमाणित केल्यानंतरच शाळेत/वसतिगृहात उपस्थित राहावे.
- ज्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे व वसतिगृह कर्मचाऱ्यांचे चाचणी अहवाल negative आहेत, त्यांनी शाळेत उपस्थित राहतांना कोविड-१९ संदर्भातील सर्व मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे आवश्यक राहील. तसेच कोविड-१९ बाबतची लक्षणे आढळल्यास त्यांनी त्वरीत चाचणी करावी.

३) **कार्यगट गठीत करणे:-** सर्व भागधारकांचे त्यांच्या विशिष्ट जबाबदाऱ्यांसहित विविध कार्यगट गठित करावे. जसे आपत्कालीन गट, स्वच्छता पर्यवेक्षण गट, इत्यादी. शिक्षक, अधिक्षक/अधिक्षिका, गृहपाल, विद्यार्थी व इतर भागधारक या गटांचे सभासद म्हणून सहकार्याने काम करतील.

४) **बैठक व्यवस्था :-**

- वर्गखोली तसेच स्टाफ रुम मधील बैठक व्यवस्था शारीरिक अंतर (Physical Distancing) च्या नियमांनुसार असावी.
- वर्गामध्ये एका बाकावर एक विद्यार्थी याप्रमाणे नावानिशी बैठक व्यवस्था असावी.

५) **वसतीगृहातील निवास व्यवस्था :-**

- वसतिगृहातील खोली तसेच गृहपाल कार्यालय मधील बैठक व्यवस्था शारीरिक अंतर (Physical Distancing) च्या नियमांनुसार असावी.
- वसतिगृहामध्ये एका खोलीत कमाल दोन विद्यार्थ्यांची निवास व्यवस्था करावी.

६) **शारीरिक अंतर (Physical distancing) च्या नियमांच्या अंमलबजावणीकरिता विविध चिन्हे व खुणा प्रदर्शित करणे :-**

- शाळेत/वसतिगृहात दर्शनी भागावर Physical distancing, मास्कचा वापर इत्यादी संदर्भात मार्गदर्शक सूचना असणारे posters/stickers प्रदर्शित करावे.
- थुंकण्यावरील बंदीची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.
- शाळेच्या अंतर्गत व बाह्य परिसरामध्ये रांगेत उभे राहण्याकरिता किमान सहा फूट इतके शारीरिक अंतर (Physical distance) राखले जाईल याकरिता विशिष्ट चिन्हे जसे चौकोन, वर्तुळ इत्यादींचा वापर गर्दी होणारी ठिकाणे जसे पाणी पिण्याच्या सुविधा , हात धुण्याच्या सुविधा, स्वच्छतागृहे इत्यादी ठिकाणी करण्यात यावा.
- शारीरिक अंतर (Physical distance) राखण्यासाठी येण्या व जाण्याचे वेगवेगळे मार्ग निश्चित करणाऱ्या बाणांच्या खुणा दर्शविण्यात याव्यात.

५) **शाळेतील/ वसतिगृहातील कार्यक्रम आयोजनावरील निर्बंध** :- परिपाठ, स्नेह संम्मेलन, क्रीडा व इतर तत्सम कार्यक्रम ज्यामुळे अधिक गर्दी होऊ शकते अशा कार्यक्रमांच्या आयोजनावर कडक निर्बंध असेल. शिक्षक- पालक बैठका ऑनलाईन घ्याव्यात.

६) **पालकांची संमती:-**

- विद्यार्थ्यांनी शाळेत/वसतिगृहात उपस्थित राहण्यापूर्वी त्यांच्या पालकांची लेखी संमती आवश्यक असेल. शाळा व्यवस्थापन समितीने पालकांशी वरील विषयी चर्चा करावी.
- आजारी असलेल्या मुलांना पालकांनी शाळेत/वसतिगृहात पाठवू नये.
- विद्यार्थ्यांना त्यांच्या पालकांच्या संमतीने घरी राहुन देखील अभ्यास करता येईल. अशा विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक प्रगतीच्या मुल्यांकनाकरिता विशिष्ठ योजना आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी तयार करावी.

**७) विद्यार्थी, पालक, शिक्षक, अधिक्षक/अधिक्षिका, गृहपाल व समाजातील सदस्य यांना कोविड-१९ च्या संदर्भातील आव्हाने व त्याबाबतची त्यांची भूमिका याबाबत जागरुक करणे:-**

- शाळा/वसतिगृहे सुरु करण्यापूर्वीच विद्यार्थी, पालक, शिक्षक, अधिक्षक/अधिक्षिका, गृहपाल व समाजातील सदस्य यांच्यात जागरुकता निर्माण करण्याकरिता शाळा व्यवस्थापन समितीने/गृहपालांनी पत्रके, पत्रे व सार्वजनिक घोषणांच्या माध्यमांचा वापर करुन पुढील मुद्द्यांबाबत कार्यवाही करावी:-
  - i. वैयक्तिक स्वच्छता व नेहमी वापरण्यात येणारे पृष्ठभागांचे निर्जंतुकीकरण इत्यादीबाबत काय करावे किंवा काय करु नये, याबाबतच्या सुचना.
  - ii. शारीरिक अंतर पालनाचे (Physical distancing) चे महत्व.
  - iii. कोविड-१९ च्या प्रतिबंधासाठी आवश्यक स्वच्छताविषयक सवयी.
  - iv. कोविड-१९ बाबतच्या गैरसमजुती.
  - v. कोविड-१९ ची लक्षणे आढळल्यास शाळेत जाणे टाळणे.
- केंद्रीय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय यांच्या सुचनांनुसार, सर्वच कर्मचारी जे (कोविड-१९च्या अनुषंगाने) अधिक उच्च धोक्याच्या पातळीमध्ये आहेत, जसे वयोवृद्ध कर्मचारी, दिव्यांग कर्मचारी, गरोदर महिला कर्मचारी व जे कर्मचारी औषध-उपचार घेत आहेत, त्यांनी अधिक काळजी घ्यावी. त्यांनी शक्यतो विद्यार्थ्यांच्या प्रत्यक्ष संपर्कात येऊ नये.

**८) शाळेतील/वसतिगृहातील उपस्थिती व वैद्यकीय रजा याबाबतच्या धोरणांमध्ये सुधारणा करणे:-**

- विद्यार्थ्यांची शाळेतील उपस्थिती बंधनकारक नसून पूर्णत: पालकांच्या संमती वर अवलंबून असेल.
- पूर्ण उपस्थितीबाबतची पारितोषिके बंद करण्यात यावी.
- शाळेतील/वसतिगृहातील कर्मचाऱ्यांना त्यांना नेमून दिलेल्या कामाव्यतिरिक्त आणिबाणीच्या प्रसंगी इतर कर्मचाऱ्यांची कामे करण्यासाठी प्रशिक्षित करावे.

**९) माहितीचे एकत्रिकरण :-**

- विद्यार्थी, पालक, शिक्षक, अधिक्षक/अधिक्षिका व गृहपालांकडून पुढील माहिती स्वयंघोषित करुन घ्यावी:-
  त्यांची आरोग्याची स्थिती, आरोग्य सेतू ॲप वरील तपासणी अहवाल, तसेच अलीकडील आंतरराष्ट्रीय व आंतरराज्य प्रवासाची माहिती.
- स्थानिक प्रशासनाकडून राज्य व जिल्हा helpline तसेच जवळील कोविड सेंटर बद्दलची माहिती.

*****

शासन परिपत्रक, क्रमांक शाआशा २०२०/प्र.क्र.१२२/का.१३ ; दि.२० नोव्हेंबर,२०२० सोबतचे

## परिशिष्ट-ब

## शासकीय आश्रमशाळा, अनुदानित आश्रमशाळा, एकलव्य निवासी शाळा व शासकीय वसतिगृहे सुरु झाल्यानंतर आरोग्य, स्वच्छता व इतर सुरक्षाविषयक उपायोजनाबाबतच्या मार्गदर्शक सूचना:-

**१) शाळेत/वसतिगृहात व शाळेच्या/वसतिगृहाच्या परिसरात स्वच्छता व आरोग्यदायी परिस्थिती सतत राखणे:-**

- शाळेचा/वसतिगृहाचा परीसर दररोज नियमितपणे स्वच्छ केला जावा.
- शाळेतील वर्गखोल्या/वसतिगृहातील खोल्या व वर्गखोल्यांच्या/ वसतिगृहातील खोल्यांच्या बाहेरील नेहमी स्पर्श होणारा पृष्ठभाग जसे लॅचेस, अध्ययन-अध्यापन साहित्य, डेस्क, टेबल, खुर्च्या इ.वारंवार स्वच्छता व निर्जंतुकीकरण करण्यात यावे.
- शाळेतील/वसतिगृहातील व शाळेच्या/वसतिगृहाच्या परीसरातील सर्व कचरा नियमितपणे विल्हेवाट लावण्यात यावी.
- हात धुण्याच्या सर्व ठिकाणी साबण, हॅन्डवॉश व स्वच्छ पाण्याची व्यवस्था करण्यात यावी. शक्य झाल्यास अल्कोहोल मिश्रित हॅन्ड सॅनिटायझर सर्व महत्त्वाच्या ठिकाणी ठेवण्यात यावा.
- शाळेतील/वसतिगृहातील स्वच्छतागृहाचे वारंवार निर्जंतुकीकरण करण्यात यावे.
- सुरक्षित व स्वच्छ पिण्याचे पाणी विद्यार्थ्यांना उपलब्ध होईल, याची दक्षता घेण्यात यावी. विद्यार्थ्यांनी सोबत वॉटर बॅाटल आणण्यासाठी त्यांना प्रोत्साहीत करावे.
- शाळा सुरू होण्यापूर्वी व शाळा सुटल्यानंतर शाळा व वर्ग खोल्यांचे नियमितपणे निर्जंतुकीकरण करण्यात यावे.
- **वरील सर्व स्वच्छतेमध्ये विद्यार्थ्यांना सहभागी करून घेऊ नये.**

**२) शाळेत/वसतिगृहात विद्यार्थ्यांना सुरक्षित ठेवणे :-**

- सर्व विद्यार्थी, शिक्षक व कर्मचारी वर्ग यांनी शाळेत येताना व शाळेत असेपर्यंत तसेच, शाळेत/वसतीगृहात कोणतीही कृती करताना मास्कचा वापर करावा. तसेच, विद्यार्थी मास्कची अदलाबदल करणार नाहीत याची दक्षता घ्यावी.
- विद्यार्थी, शिक्षक व कर्मचारी वर्गाची तसेच वसतिगृहातील विद्यार्थी व कर्मचाऱ्यांची दररोज साधी आरोग्य चाचणी जसे Thermal Screening घेण्यात यावी.
- विद्यार्थी, शिक्षक व शाळेतील/वसतिगृहातील कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त इतर कोणत्याही व्यक्तिला शाळेचा/वसतिगृहाच्या आवारात व शाळेच्या/वसतिगृहाच्या प्रवेशद्वारावर प्रवेश देऊ नये.
- काही विद्यार्थी सूचनांचे पालन करत नसल्यास ते त्यांच्या पालकांच्या निदर्शनांस आणावे.

३) **कर्मचारी व विद्यार्थी यांचा सुरक्षीत प्रवेश व गमन** (Entry and Exit) :-

- विद्यार्थ्यांनी शाळेने/वसतिगृहाने निश्चित केल्याप्रमाणे शाळेत/वसतिगृहात उपस्थित रहावे. शाळेत/वसतिगृहात वावरताना त्यांनी किमान ६ फुट अंतराचे पालन करावे.
- विद्यार्थी व कर्मचारी वर्गांचे आगमन व गमन (Entry and Exit) यांचे वेळापत्रक अशा प्रकारे निश्चित करावे, ज्यामुळे शाळेत/वसतिगृहात होणारी गर्दी टाळली जाईल.
- विविध इयत्तांचे वर्ग सुरु होण्याच्या व संपण्याच्या वेळामध्ये किमान १० मिनिटांचे अंतर असावे.
- शाळेच्या/वसतिगृहाच्या परिसरात चार पेक्षा जास्त विद्यार्थी एकत्र जमणार नाहीत, ही मुख्याध्यापकांची/गृहपालांची जबाबदारी असेल.
- शाळेस/वसतिगृहास एकापेक्षा अधिक प्रवेशद्वार असल्यास शाळेत/वसतिगृहात येताना व जातांना सर्व प्रवेशद्वारांचा वापर करावा.
- शाळेच्या/वसतिगृहाच्या प्रमुखांनी आजारी असल्याच्या कारणामुळे कर्मचाऱ्यास रजेवर राहण्याची परवानगी देण्यात यावी.
- कुटुंबातील एखादा सदस्य किंवा घराजवळील एखादी व्यक्ती ताप / खोकला यानी आजारी असल्यास आपल्या मुलांना शाळेत/वसतिगृहात न पाठविण्याबाबत पालकांना अवगत करावे.

४) **वर्गखोल्या व इतर ठिकाणी सुरक्षिततेच्या मानकांची खात्री करावी :-**

- शाळेत प्रात्यक्षिक कार्ये (Practicals) घेताना विद्यार्थ्यांचे लहान लहान गट करुन घेण्यात यावेत म्हणजे शारीरिक अंतराचे (Physical Distancing) पालन करणे सुलभ होईल.
- विद्यार्थ्यांनी कोणतेही साहित्य जसे पुस्तके, वही, पेन, पेन्सिल, वॉटर बॉटल, जेवणाची भांडी, अंथरूण-पाघरून, कपडे, टॉवेल, साबण, इत्यादींची अदलाबदल करू नये.
- ज्या विद्यार्थ्यांनी ऑनलाईन शिक्षणाचा पर्याय स्वीकारला असेल त्यांच्यासाठी ऑनलाईन गृहपाठाची व्यवस्था करावी.
- शक्य असल्यास वर्ग खुल्या परिसरात घ्यावेत. शक्य नसल्यास वर्गखोल्यांची दारे व खिडक्या उघड्या ठेवण्यात याव्यात. कोणत्याही परिस्थितीत बंद खोल्यांमध्ये वर्ग भरवण्यात येऊ नये.
- उदवाहन (lift) व व्हरांड्यांतील उपस्थित व्यक्तीच्या संख्येवर निर्बंध आणावेत.
- स्वच्छतागृहामध्ये अधिक गर्दी होऊ नये, याची दक्षता घ्यावी.
- विद्यार्थ्यांनी प्रत्येक कृती केल्यानंतर हात स्वच्छ धुवावेत.

५) **अभ्यासवर्गांची व्यवस्था:-**

- शाळा व्यवस्थापन समितीने शाळेतील गर्दी टाळण्यासाठी एक दिवसआड विद्यार्थ्यांना शाळेत बोलवावे (५० टक्के विद्यार्थी एका दिवशी व उर्वरित ५० टक्के विद्यार्थी दुसऱ्या दिवशी). अशाप्रकारे एकाच दिवशी ५० टक्के विद्यार्थी अनलॉक वर्गात व उर्वरित ५० टक्के विद्यार्थी प्रत्यक्ष वर्गात उपस्थित राहून शिक्षण घेतील.

- इयत्ता निहाय अनलॉक वर्गांचे वेळापत्रक, शिक्षकांची जबाबदारी निश्चिती याची जबाबदारी संबंधित शाळेच्या मुख्याध्यापकांची असेल. शक्यतो मुख्य विषय (Core Subjects) जसे गणित, विज्ञान व इंग्रजी शाळेत शिकवावेत व उर्वरित विषय शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांप्रमाणे अनलॉक लर्निंग पद्धतीने शिकवावेत.
- प्रत्यक्ष वर्गांचा कालावधी ३ ते ४ तासांपेक्षा अधिक असू नये. प्रत्यक्ष वर्गांकरिता जेवणाची सुट्टी नसेल.

**६) कोविड-१९ संशयित आढळल्यास करावयाची कार्यवाही :-**

- शिक्षक, कर्मचारी वर्ग किंवा विद्यार्थी संशयित आढळल्यास त्यास एका खोलीत इतरांपासून वेगळे ठेवावे.
- तात्काळ रुग्णालय किंवा जिल्हा व राज्य संपर्क क्रमांकास (Helpline) कळवावे. त्यानंतर सर्व परिसराचे व त्या जागेचे निर्जंतुकीकरण करावे. राज्य व जिल्हा helpline क्रमांक तसेच जवळील कोविड सेंटर बद्दलची माहिती मुख्याध्यापक, शिक्षक, अधिक्षक/अधिक्षिका, व प्रत्येक गृहापालांच्या मोबाईलमध्ये असावी.

**७) मानसिक व सामाजिक कल्याण :-**

- चिंता आणि निराशा यासारख्या मानसिक आरोग्याच्या समस्या नोंदविणाऱ्या किंवा सांगणाऱ्या विद्यार्थी आणि शिक्षकांसाठी, गृहपालांसाठी नियमित समुपदेशन केले जाईल, याची सुनिश्चिती करावी.
- शिक्षकांनी, अधिक्षक/अधिक्षिकांनी, शालेय समुपदेशकांनी, शालेय आरोग्य कर्मचाऱ्यांनी व गृहपालांनी विद्यार्थ्यांचे व आपले मानसिक स्थिरता निश्चित करण्यासाठी एकत्रितपणे कार्य करावे.

**उपरोक्त सूचनांव्यतिरिक्त स्थानिक परिस्थितीनुसार शाळांनी आवश्यक मार्गदर्शक सुचना निश्चित कराव्यात.**

*****